विजाभज प्रवर्गाच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळांना वेतनेतर अनुदान देण्याबाबतच्या तरतुदी रद्द करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग

## शासन निर्णय क्र. विभशा-२०१३/प्र.क्र.१३०/विजाभज-२

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-३२

दिनांक :- ०३ ऑगस्ट, २०१८

<u>वाचा</u>:- १. शासन निर्णय क्र. विभशा-२००६/प्र.क्र.५९/ मावक-६, दि. २६ जून २००८

२. शासन निर्णय क्र. विभशा-२००९/प्र.क्र.४७/ विजाभज-२, दि. २१ जानेवारी २०१३.

३. शासन शुद्धीपत्रक क्र. विभशा-२००९/प्र.क्र.४७/ विजाभज-२, दि. २४ जानेवारी २०१३.

४. शासन ज्ञापन क्र. विभशा-२००९/प्र.क्र.४७/ विजाभज-२, दि. ८ फेब्रुवारी २०१३.

५. शासन निर्णय क्र. विभशा-२०१३/प्र.क्र.१३०/ विजाभज-२, दि. ०१ ऑगस्ट २०१८

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय क्रमांक विभशा-२००६/ प्र क्र.५९/मावक-६ दि.२६.०६.२००८ अन्वये राज्यातील विजाभज प्रवर्गाच्या १२५ व शासन निर्णय दि.३१/०८/२००९ अन्वये २३ माध्यमिक अशा १४८ उच्च माध्यमिक आश्रमशाळांना परवानगी देण्यात आली आहे. तसेच सदरहू शासन निर्णयांमध्ये १४८ उच्च माध्यमिक आश्रमशाळांना देय होणाऱ्या वेतनेतर अनुदानाबाबतही तरतुद करण्यात आलेली आहे. तसेच शासन निर्णय क्र. विभशा-२००९/प्र.क्र.४७/विजाभज-२ दि.२१.०१.२०१३ व शासन शुद्धीपत्रक दि. २४.०१.२०१३ अन्वये या उच्च माध्यमिक आश्रमशाळांना वेतनेतर अनुदान मंजुर करण्याचे आदेश निर्गमित करण्यात आले होते. परंतु, या उच्च माध्यमिक आश्रमशाळांना वेतनेतर अनुदान देण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यापूर्वी त्यास वित्त विभागाची सहमती घेणे आवश्यक होते. मात्र, सदरहू शासन निर्णय निर्गमित करताना वित्त विभागाची मान्यता घेण्यात आली नसल्याची बाब निदर्शनास आल्यामुळे संदर्भ क्र.०५ येथील शासन निर्णयान्वये शासन निर्णय दि. २१.०१.२०१३ व शासन शुद्धीपत्रक दि.२४.०१.२०१३ रद्द करण्यात आलेले आहेत.

तसेच शासन निर्णय दि.२६ जून २००७, शासन निर्णय दि.२६ जून २००८ व शासन निर्णय दि.३१ ऑगस्ट २००९ मध्ये उच्च माध्यमिक आश्रमशाळांना वेतनेतर अनुदान देण्याबाबतची तरतुद रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

मा. उच्च न्यायालयाचे आदेशानुसार सदरहू प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेसाठी पाठविला होता. त्यांनी शासन कार्यनिमावलीतील नियम क्र. ११(१)(अ) (एक) (दोन) व ११ (ब ) अन्वये राज्यातील आर्थीक व्यवस्थेवर परिणाम करणाऱ्या वित्तीय / आर्थिक भारांच्या प्रस्तावास वित्त विभागाची पूर्व मान्यता घेणे आवश्यक आहे. तथापि, उच्च माध्यमिक आश्रमशाळांना वेतनेतर अनुदान मंजुर करण्याबाबतच्या प्रस्तावास वित्त विभागाची मंजुरी घेण्यात आलेली नाही. त्यामुळे शासन निर्णय दि.२६ जून २००७, शासन निर्णय दि.२६ जून २००८ व शासन निर्णय दि.३१ ऑगस्ट २००९ मध्ये उच्च माध्यमिक आश्रमशाळांना फक्त वेतनेतर अनुदान देण्याबाबतची तरतुद तात्काळ रद्द करण्यात येत आहे. मात्र इतर सर्व तरतुदी कायम राहतील.

२. विजाभज प्रवर्गाच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळांना वेतनेतर अनुदान देण्यासंदर्भातील दाखल सर्व याचिकांमधील याचिकाकर्ता यांना शासनाचा सदरील निर्णय विनाविलंब अवगत करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीबाबत मा. उच्च न्यायालयास व शासनास तात्काळ अवगत करण्यात यावे.त्याचप्रमाणे सदरहू प्रकरणी मा. उच्च न्यायालयात शपथपत्र दाखल करावयाची आवश्यकता भासल्यास शासनाच्यावतीने मा. उच्च न्यायालयात याचिका परत्वे अथवा प्रकरण परत्वे शपथपत्र दाखल करण्यास सर्व संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. याबाबतच्या शपथपत्रास परत शासनाची मान्यता आवश्यक राहणार नाही.

३. सदरील शासन निर्णय वित्त विभागाच्या समतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २९१/ व्यय-१४, दि.१८/०७/२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८०८१०१६४२५०९५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S. A. Pedgaonkar

Digitally signed by S. A. Pedgaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b2ac85a22a7c244beaad68d7bf50398b67204dc905155ddd4219e64a8ba0c058, cn=S. A. Pedgaonkar
Date: 2018.08.10 16:45:49 +05'30'

**( सु.अ.पेडगांवकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१) मा.राज्यपालाचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव.
४) मा.राज्यमंत्री, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण यांचे खाजगी सचिव.
५) मा. मुख्य सचिव यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा. सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण यांचे स्वीय सहाय्यक.
७) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, संचालनालय, पुणे.
८) प्रादेशिक उपायुक्त समाज कल्याण सर्व विभाग
९) सहायक आयुक्त समाज कल्याण सर्व जिल्हे.
१०) सर्व मंत्रालयीन विभाग
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१३) सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण विभाग
१४) सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण विभाग
१५) सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी,
१६) महालेखापाल (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र१/२ मुंबई/नागपूर.